अनिवासी क्रीडा प्रबोधिनीची स्थापना - निधी वितरीत करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१६/प्र.क्र.२१९/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ मार्च, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:क्रीडाधो-३११३/(प्र.क्र.४५/१३)/ क्रीयुसे-३, दिनांक २१ सप्टेंबर, २०१३.

२) उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक:शिक्रीप/तरतूद/क्रीप्रकें/निवि/ २०१६-१७/का-११/९५५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील उदयोन्मुख खेळाडूंना स्थानिक स्तरावर खेळाच्या उत्तम सुविधा व तांत्रिक प्रशिक्षण नियमित दिल्यास खेळाचा दर्जा उंचावण्यास मदत होईल. त्याचप्रमाणे पुणे व कोल्हापूर येथील शूटींग या खेळातील अनिवासी क्रीडा प्रबोधिनीचे यश लक्षात घेवून क्रीडा धोरण समितीने केलेल्या शिफारशीनुसार राज्यात वसतीगृहात न राहता क्रीडा प्रशिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या खेळाडूंसाठी अनिवासी क्रीडा प्रबोधिनीची योजना दिनांक ९ जुलै, १९९९ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आली होती. उपरोक्त शासन निर्णय अधिक्रमीत करुन शासन निर्णय दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ अन्वये नवीन स्वरुपात अनिवासी क्रीडा प्रबोधिनी योजना कार्यान्वित करुन शासन मान्यता देण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु.४०.९१ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. सदर तरतूदीपैकी रु.३०.३८ लक्ष इतकी तरतूद दिनांक ०४.०२.२०१७ च्या शासन निर्णय अन्वये वितरीत करण्यात आली आहे. उर्वरित निधीपैकी ८०% च्या मर्यादेत रु.२.०४८ लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय:-

उपरोक्त पार्श्वभूमीवर अनिवासी क्रीडा प्रबोधिनीची निर्मिती करणे या योजनांतर्गत योजनेकरीता सन २०१६-१७ या वर्षाकरिता अर्थसंकल्पीत तरतूद रु.४०.९१ लक्ष पैकी रु.२.०४८ लक्ष तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१६-१७ मध्ये अनिवासी क्रीडा प्रबोधिनीची स्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.४०.९१ लक्ष एवढया तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३) (०२) जिल्हा स्तरावर बिगरनिवासी क्रीडा अकादमी स्थापन करणे (२२०४ ५३९५), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१) वित्त विभागाच्या दिनांक २०.०४.२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये ८०% निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत

४.२) सन २०१६-१७ या वर्षाकरिता जिल्हा स्तरावर बिगरनिवासी क्रीडा अकादमी स्थापन करणे याकरिता चालू आर्थिक वर्षात रु.४०.९१ लक्ष अर्थसंकल्पीत आहे.

४.३) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.५) दिनांक २४.०७.२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.६) उपरोक्त परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभाग दिनांक २०.०४.२०१६ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २०.०४.२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६, ७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२३१४५७५६५२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.23 14:59:43 +05'30'

**( कि. ल. संखे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,

४. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर

५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)

६. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)

७. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),

८. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,

९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०. निवड नस्ती (क्रीयुसे-१).